~~२०१५०४२३१५२२११०२६~~

(२७२) २०१५०४२३१५२२२६०३२७

**डोमहिरा नदी प्रकल्प ता.जव्हार, जि.ठाणे या योजनेस व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत**

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.लपायो-२००५/(३४०/२००५) खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १०/०१/२०११

**पहावे :** १) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्र.३३९९/४/७/तां-१/२७९५, दिनांक १०.८.२००५

**प्रस्तावना :-**

डोमहिरा नदी प्रकल्प ता.जव्हार, जि.ठाणे या योजनेस शासन निर्णय दि.१६.१०.१९८५ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तद्नंतर शासन निर्णय क्र.लपायो २०११/(१२/२०००) खारभूमी दि.१९.१.२००१ अन्वये सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. या योजनेस सन १९९०-९१ या वर्षी प्रथम अनुदान उपलब्ध झाले. तथापि वन जमीनीच्या अडचणीमुळे प्रकल्पाचे काम सुरू करता आले नाही. या योजनेची अनुषंगिक कामे सन १९९८-९९ मध्ये सुरू करण्यात आली. त्यानंतर वन जमीनीच्या भूसंपादनाचा प्रस्ताव केंद्र शासनाच्या पर्यावरण व वन मंत्रालयाकडून डिसेंबर २००० मध्ये मंजूर झाल्यानंतर प्रकल्पाचे प्रत्यक्षात काम सुरू करण्यात आले. सदर काम करतेवेळी शिर्षनिहाय कामाच्या किमतीमध्ये व परिमाणामध्ये वाढ होत असल्याने संपूर्ण कामाचे सन २००३-०४ च्या दरसूचीवर आधारित अंदाजपत्रक तयार करून व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांनी शासनाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता व सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावा संदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

शासन आता या निर्णयाव्दारे डोमहिरा नदी प्रकल्प ता.जव्हार, जि.ठाणे या योजनेचा एकूण अंदाजित खर्च रू.७३,४७,२३,०००/- (रुपये त्र्याहत्तर कोटी सत्तेचाळीस लक्ष, तेवीस हजार, फक्त) यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रुपये ५८,७९,७८,०००/- कामाप्रित्यर्थ व रूपये १४,६७,४५,०००/- अनुषंगिक खर्च आहे. अंदाजपत्रकात कामासाठी सन २००३-२००४ या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहे. उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३ "४७०२ लहान पाटबंधा-यावरील भांडवली खर्च ८०० इतर खर्च (१) सर्वसाधारण लघु पाटबंधारे योजना (१)" कोकण पाटबंधारे विकास महामंडळ

भाग भांडवली अंशदान या शीर्षाखाली खर्ची घालावा व कोकण पाटबंधारे विकास महामंडळाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदरहू ल.पा.योजना प्रति स.घ.मी. पाणीसाठयाच्या दृष्टीने प्रचलित आर्थिक मापदंडात बसत नसल्यामुळे शासन निर्णय दि. १५.५.१९९९ नुसार सदर प्रस्ताव " ब " प्रकारात मोडत असल्याने प्रस्ताव व्यय अग्रक्रम समितीसमोर सादर करण्यात आला होता. व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक २७.२.२००९ रोजी झालेल्या बैठकीत सदर प्रस्तावास व्यय अग्रक्रम समितीने मान्यता दिली आहे. त्यानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान केलेली प्रशासकीय मान्यता अनुक्रमांक (०५/२०११) वर नोंदविण्यात आली आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( ज.प्र.जहागिरदार )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रतिलीपी अंदाजाच्या गोषवा-यावसह :-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
मुख्य अभियंता (दवप्र) व सह सचिव, मंत्रालय, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे
उपसचिव (लघु पाटबंधारे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी अभियंता, ठाणे लघु पाटबंधारे विभाग, कळवा-ठाणे
उपअभियंता (खारभूमी) मंत्रालय, मुंबई
अर्थशाखा १/२ (२ प्रती) / लपा-१ जलसंपदा विभाग,
जिल्हाधिकारी, ठाणे
**विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई**
**खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.**

(शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्रमांक लपायो-२००५/(३४०/२००५) खारभूमी दिनांक १०.०१.२०११ चे सहपत्र)

## डोमहिरा नदी प्रकल्प, ता.जव्हार, जि.ठाणे अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | उपशीर्ष | शिर्षकामे | कालवा | एकूण (रु.लक्ष) |
|---|---|---|---|---|
| १) | ए-प्राथमिक | १३.५२ | २६.०० | ३९.५२ |
| २) | बी-भूसंपादन | ७६.३० | ३६.२६ | ११२.५६ |
| ३) | सी-कामे | ४०३७.६९ | -- | ४०३७.६९ |
| ४) | डी-विमोचक (हायड्रो पॉवर जनरेशनसह) | ३०५.१७ | ७.४६ | ३१२.६३ |
| ५) | इ-फॉल | -- | -- | -- |
| ६) | एफ.आर.एच.टी.कामे | -- | ५९७.२७ | ५९७.२७ |
| ७) | जी-पूल | ८८.३४ | १२.२० | १००.५४ |
| ८) | एच-एक्सेप | -- | २.०० | २.०० |
| ९) | के-इमारती | ४४.४७ | -- | ४४.४७ |
| १०) | एल-मातीकाम | -- | ५४६.७९ | ५४६.७९ |
| ११) | एम-वृक्षारोपण | ०.२५ | २.९९ | ३.२४ |
| १२) | ओ-संकीर्ण | ८.९१ | ०.६४ | ९.५५ |
| १३) | पी-देखभाल | २६.७७ | ४.९५ | ३१.७२ |
| १४) | आर-दळणवळण | ६.१० | १४.१२ | २०.२२ |
| १५) | वितरिका | -- | २१.५८ | २१.५८ |
| | कामाप्रित्यर्थ एकूण रुपये | ४६०७.५२ | १२७२.२६ | ५८७९.७८ |
| | अधिक अनुषंगिक खर्च २५.५० टक्के या दराने (भूसंपादन वगळून) | | | १४६७.४५ |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत** | | | **७३४७.२३** |

## ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| १) नियोजित पाणीसाठा | १४४९० सघमी |
| २) नियोजित सिंचनक्षेत्र | ६८५ हेक्टर |
| ३) पाणीसाठयाची प्रती स.घ.मी.किंमत (रुपये) | ५०७१३ (> महत्तम मापदंड रू.२८६७०) |
| ४) लाभव्यय गुणोत्तर | १.१३ > लघुत्तम मापदंड १ |